आयसीटी योजना (तिसरा टप्पा) अंमलबजावणी संदर्भात बिर्ला श्लोका एज्युटेक लि. आणि व्हीजन इंडिया सॉफ्टवेअर एक्सपोर्टस् लि. या संस्थेस निधी वितरीत करणेबाबत. (चौथी सहामाही)

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

### शासन निर्णय क्रमांकः आयसीटी २०१४/प्र.क्र.२५/एस.डी-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई
दिनांक: २५ नोव्हेंबर, २०१६

**वाचा-**

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०११/प्र.क्र.१२/संगणक, दि. २५/०३/२०१३
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०११/प्र.क्र.१२/संगणक ,दि.०७/११/२०१३
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०१४/प्र.क्र.२५(३)/एस.डी.१, दि.३०/०७/२०१४
४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०१४/प्र.क्र.२५/एस.डी.१, दि.१२/०९/२०१४
५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०१४/प्र.क्र.२५/एस.डी.१, दि.३१/०५/२०१५
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३४/कोषा. प्रशा-५/, दि. २४/०७/२०१५
७) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०१४/प्र.क्र.२५/एस.डी.१, दि.११/०९/२०१५
८) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०१४/प्र.क्र.२५/एस.डी.१, दि.१८/०३/२०१६
९) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०१४/प्र.क्र.२५/एस.डी.१, दि.३०/०३/२०१६
१०) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २०/०४/२०१६
११) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. आयसीटी-२०१४/प्र.क्र.२५/एस.डी.१, दि.२०/१०/२०१६
१२) राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियानाचे पत्र क्र. रामाशिअ/ICT/टप्पा-३/(८३८ शाळा)/२०१६-१७/११८३ दि. २२/११/२०१६

**प्रस्तावना-**

राज्यात केंद्र पुरस्कृत माहिती तंत्रज्ञान व दळणवळण (Information & Communication Technology) योजनेच्या तिसरा टप्पा ५००० माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमध्ये राबविण्यास शासनाच्या संदर्भाधिन दि. २५/०३/२०१३ आणि दि. ०७/११/२०१३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजना BOOT तत्वावर राबविण्यात येत असून यासाठी निविदा प्रक्रियेव्दारे ५ वर्षासाठी BOOT तत्वावर प्रतिशाळा रुपये १७.९० लक्ष एवढया दराने योजना राबविण्यासाठी दोन ऑपरेटर्सची नियुक्ती करण्यात आलेली आहे. या योजनेसाठी नियुक्त करण्यात आलेल्या दोन ऑपरेटर्सपैकी बिर्ला श्लोका एज्युटेक लि. आणि व्हीजन इंडिया सॉफ्टवेअर एक्सपोर्टस् लि. या संस्थेस दि. २५/०३/२०१३ च्या शासन निर्णयान्वये ८५० शाळा मंजूर करण्यात आलेल्या आहेत. सदर संस्थेने ८५० शाळापैकी ८३८ शाळांमध्ये संगणक प्रयोगशाळा स्थापन करण्यात आलेल्या आहेत. तसेच सदर ८३८ शाळात आयसीटी योजनेच्या अंमलबजावणीसाठी चौथ्या सहामाहीच्या रु. ७५०.०१ लक्ष इतक्या देय निधीतून दंडाची रक्कम

रु. ४.६० लक्ष वजा जाता उर्वरित रु. ७४५.४१ लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय -**

बिर्ला श्लोका एज्युटेक लि. आणि व्हीजन इंडिया सॉफ्टवेअर एक्सपोर्टस् लि. या संस्थेला ८३८ शाळांत योजनेच्या अंमलबजावणी करीता दि. १ जानेवारी, २०१६ ते ३० जून २०१६ या चौथ्या सहामाहीचा देय निधी रु. ७४५.४१ लक्ष (अक्षरी रुपये सात कोटी पंचेचाळीस लक्ष एकेचाळीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास सदर शासन निर्णयान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१६-१७ या चालू आर्थिक वर्षाकरिता "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०२ माध्यमिक शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (००) (०६) शाळांमध्ये माहिती व संदेशवहन तंत्रज्ञान योजना कार्यान्वित करणे (केंद्र हिस्सा) (२२०२ ३७९१) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षांतर्गत रु. १२००० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सदर खर्च या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. वित्त विभागाच्या दि. २४/०७/२०१५ च्या परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

३.१) वित्त विभागाच्या दि. २०/०४/२०१६ च्या परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

३.२) यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

३.३) ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

३.४) रक्कम ऑपरेटरच्या नांवे ECS व्दारे आहरित करावी.

३.५) दि. २४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

३.६) परिपत्रकातील "अ" व "ब" ची पूर्तता होत आहे.

४. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २०/०४/२०१६ व दि. २४/०७/२०१५ च्या परिपत्रकातील सूचना नुसार करण्यात यावा. यासाठी कक्ष अधिकारी (रोख शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व उप सचिव (प्रशासन) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर आदेश वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २०/०४/२०१६ च्या परिपत्रकास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील १, २, ३, ४, ६, ७ व ८ मधील बाबी या आदेशासाठी लागू नाहीत. परिशिष्टातील मुद्दा क्र. ५

नुसार केंद्र शासनाचा निधी प्राप्त झाला असल्याचे अभिप्राय वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र. ३२७/अर्थोपाय, दि. १४/१०/२०१६ अन्वये दिलेले आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११२५१५५५०९६६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Baban Ranganath Mali

Digitally signed by Baban Ranganath Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=058a3365edca1bab7b5a512fa9b602a739d12b55819b89fd7154a7a28ccbaa1e, serialNumber=d2974b67a90018e618d5e11ffd00382f063542cc3d866753cfd5a4ad652b1908, cn=Baban Ranganath Mali
Date: 2016.11.28 13:58:29 +05'30'

**(बी. आर. माळी)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
३) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
४) राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान, चर्नीरोड, मुंबई
५) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
८) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ६३
९) सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, (पुणे)
११) वित्त विभाग, व्यय-५ / अर्थसंकल्प शाखा
१२) अर्थसंकल्प कार्यासन, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) निवड नस्ती - एस.डी.१, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई